**धार्मिक स्थळाच्या बांधकामास सुरवात करण्यापूर्वी गृह विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**परिपत्रक क्रमांक-सीटीएम-१००९/प्र.क्र.६०१/वि.शा.१ ब.**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. दिनांक - २३ नोव्हेंबर, २००९.**

**वाचा :** १) शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक-सीटीएम-२०००/प्र.क्र.२४/विशा-१ ब, दि.७ जून,२०००.

## परिपत्रक

धार्मिक स्थळाचे अनधिकृत बांधकामास आळा घालण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन दिनांक ७ जून,२००० च्या परिपत्रकाअन्वये दिलेले निर्देश पुढीलप्रमाणे सुधारण्यात येत आहेत :-

(१) महानगरपालिका क्षेत्रातील धार्मिक स्थळाचे नवीन बांधकाम, वाढीव बांधकाम वा पुर्नबांधणीचे प्रस्ताव संबंधित महानगरपालीका आयुक्तांनी बांधकामाच्या आराखडयास प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी प्रशासकीय विभाग म्हणून नगर विकास विभागास पाठवावेत.

(२) ग्रामपंचायत/नगरपालीका क्षेत्रातील धार्मिक स्थळाचे नवीन बांधकाम, वाढीव बांधकाम वा पुनर्बांधणीचे प्रस्ताव संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी बांधकामाच्या आराखडयास प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी संबंधित प्रशासकीय विभागाला (ग्राम विकास विभाग/ महसूल व वन विभाग) पाठवावेत.

(३) नगर विकास /ग्राम विकास/महसूल व वन विभागाने प्राप्त प्रस्ताव परिपूर्ण असल्यास कायदा,सुव्यवस्था व रहदारीचे अनुषंगाने गृह विभागाकडे अनौपचारिक संदर्भाद्वारे ना-हरकत प्रमाणपत्राची मागणी करावी.

(४) गृह विभागाकडून कायदा,सुव्यवस्था व रहदारी संबंधाने ना-हरकत प्रमाणपत्र संबंधित प्रशासकीय विभागास पाठविण्यात येईल.

(५) गृह विभाग संबंधित पोलीस आयुक्त,पोलीस महासंचालक यांचेकडून अभिप्राय प्राप्त करुन घेवून 'ना-हरकत' प्रमाणपत्राबाबत निर्णय घेईल.

(६) गृह विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त केल्याशिवाय कोणत्याही धार्मिक स्थळाचे बांधकामास/वाढीव बांधकामास/दुरुस्तीस/पुनर्बांधणीस सुरुवात करण्यात येऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(दत्तात्रय बोऱ्हाडे)
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन, गृह विभाग**

प्रति,
प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व महानगपालिका आयुक्त.
सर्व पोलीस आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व पोलीस अधिक्षक